**बोदवड परिसर उपसा सिंचन योजना, ता. बोदवड, जि. जळगांव या प्रकल्पाचे काम सुरु करण्यास मान्यता मिळणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक:बोदवड-०५१०/प्र.क्र.२७९/१०/मोप्र-१**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक:-३ जानेवारी, २०१७

**प्रस्तावना :**

तापी खोऱ्यातील जळगाव जिल्हयातील बोदवड, जामनेर मुक्ताईनगर तालुक्यातील ३३,६६८ हेक्टर तसेच सिंचन अनुशेषाच्या बुलढाणा जिल्हयातील मोताळा व मलकापूर तालुक्यातील १९,७८१ हेक्टर असे एकूण ५३,४४९ हेक्टर पिक क्षेत्रास सिंचनाचा लाभ देण्यासाठी जळगाव जिल्हयातील बोदवड परिसर सिंचन योजनेस तापी पाटबंधारे विकास महामंडळाने सन १९९७-९८ च्या दरसूचीवर आधारित रुपये ५२२.२० कोटीस दि. २ फेब्रुवारी, १९९९ मध्ये प्रशासकीय मान्यता देण्यात आली होती.

तद्नंतर महामंडळाने सदरील योजनेस १९९९-२००० च्या दरसूचीवर आधारित रुपये ६८९.१४ कोटीस दिनांक १ सप्टेंबर १९९९ रोजी प्रथम सुप्रमा प्रदान करण्यात आली होती. यानंतर या योजनेस सन २००७-२००८ च्या दरसूचीवर आधारित रुपये १५०८.२३ कोटीस दिनांक ४ सप्टेंबर २००८ रोजी व्दितीय सु.प्र.मा. प्रदान केली होती. सन २००९-१० चे दरसुचीवर आधारित योजनेची अद्ययावत किंमत रुपये २१७८.६७ कोटी इतकी आहे. मुळ प्रशासकीय मान्यतेनुसार योजनेचे लाभ : व्यय गुणोत्तर १.८० असुन व्दितीय सुधारित प्रशासकीय मान्यतेनुसार ते १.५१ इतके आहे.

बोदवड परिसर उपसा सिंचन योजना या प्रकल्पाचा शुभारंभ/भूमीपूजन कार्यक्रम भारताच्या तत्कालीन महामहीम राष्ट्रपती महोदया यांच्या हस्ते व राज्याचे तत्कालीन मा.मुख्यमंत्री यांच्या प्रमुख उपस्थित दि.११.६.२०११ रोजी संपन्न झालेला आहे. या प्रसंगी राज्याच्या तत्कालीन मा.मुख्यमंत्री यांनी महामहीम राष्ट्रपती यांना सदरील योजनेच्या बांधकामास राज्य शासनामार्फत गती देण्यात येईल असे आश्वासीत केलेले होते. तथापि, प्रत्यक्षात योजनेचे काम सुरु झालेले नाही.

सदर योजना दोन उपसा टप्प्याची आहे. टप्पा-१ व टप्पा-२ मुळे अनुक्रमे १४,९९४ हेक्टर व ३८,४५५ हेक्टर पिक क्षेत्रास सिंचनाचा लाभ मिळणार आहे.

बोदवड परिसर उपसा सिंचन योजना या प्रकल्पास केंद्र शासनाकडून विशेष सहाय्य (Grant in Aid) अंतर्गत केंद्रीय जलसंसाधन मंत्रालयाचे पत्र क्र. २७/२/२०१२-PR दिनांक २४/७/२०१२ अन्वये एकरकमी रुपये ५०० कोटी अर्थसहाय्य देण्याचा निर्णय झाला आहे व त्यापैकी रु. ६६.६६ कोटी इतका निधी केंद्रशासनाकडून राज्य शासनास प्राप्त झाला आहे.

या पार्श्वभूमीवर सदरील योजनेचे काम हाती घेण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

सन २००९-१० चे दरसुचीवर आधारीत तापी खो-यातील बोदवड परिसर उपसा सिंचन योजनेचे काम सुरु करणेस खालील अटींच्या अधीन राहून मान्यता देण्यात येत आहे.

१) योजनेच्या पहिल्या टप्पाअंतर्गत पंपगृह १ अ, पंपगृह १ ब, जुनोने साठवण तलावाचे ३०१.०० मी. तलांकापर्यंतचे काम व उध्दरण नलिकेची एक रांग ही कामे प्राधान्याने पूर्ण करुन १४,९९४ हेक्टर सिंचन क्षमता निर्माण करण्यात यावी.

२) टप्पा-१ चे तसेच तापी महामंडळाचे अन्य बांधकामाधीन प्रकल्पावरील निधीच्या उपलब्धतेवर परिणाम होऊ न देता निश्चित कालमर्यादेत योजनेच्या टप्पा-२ चे काम पुर्ण करण्यासाठी पुरेसा अतिरिक्त निधी उपलब्ध झाल्यानंतर तापी पाटबंधारे विकास महामंडळाचे नियामक मंडळाचे मान्यतेने टप्पा-२चे काम हाती घ्यावे.

३) दि.२४ जुलै २०१२ चे पत्रान्वये केंद्र शासनाने मान्य केलेल्या अर्थसहाय्याबाबतचे दृढीकरण केंद्र शासनाकडून करुन घ्यावे.

४) प्रकल्पासाठी मंजूर झालेली रु.५०० कोटीची केंद्रीय अर्थसहाय्याची रक्कम प्राप्त करुन घेऊन ती टप्पा-१ च्या कामासाठी खर्च करावी. त्यानंतरच राज्य शासनाची तरततूद खर्च करावी.

५) बोदवड उपसा सिंचन योजनेच्या कामासाठी केंद्रशासनाकडून प्राप्त होणारा अर्थसहाय्याचा निधी (Grant in aid) हा विशिष्ट प्रकल्पासाठी असल्याने मा. राज्यपाल महोदयांच्या सिंचन क्षेत्रासाठी निधी वितरण सुत्राबाहेर ठेवण्यासाठी मा.राज्यपाल महोदयांना विनंती करण्यात यावी.

६) प्रस्तावित काम अस्तित्वात असलेल्या करारा अंतर्गत करणे किंवा सदर फेरनिविदा बोलाऊन नविन करारा अंतर्गत करणेबाबतचा निर्णय शासनाचे सर्वंकष हित विचारात घेऊन गुणवेत्तच्या आधारे संबंधीत मुख्य अभियंता यांनी घ्यावा.

या प्रकल्पाच्या कामावरील खर्च मागणी क्र. आय-५, मुख्य लेखाशीर्ष ४७०१ मोठे व मध्यम पाटबंधाऱ्यावरील भांडवली खर्च, (१९०) सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमातील गुंतवणूका, (०४) (०२) (संगणक संकेतांक ४७०१ आय १७१) या लेखाशिर्षाखाली खर्ची घालावा व शासनाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

सदरील शासन निर्णय हा नियोजन विभागाचे अनौपचारीक संदर्भ क्र. ४९१६ दि. २/७/२०१६ अन्वये दिलेले अभिप्राय तसेच वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.२३९/व्यय-१२,दि.९/९/१६ अन्वये प्राप्त सहमतीने व दि.३/१/२०१७ रोजी मा. मंत्रीमंडळाने घेतलेल्या निर्णयास अनुसरून निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१७०१०३१५०१०२११२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sharad Shankar Dabhadkar

Digitally signed by Sharad Shankar Dabhadkar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=531ee7ca7a2d3a1d0ad6391d978b4614a6f407abdc7276384df12925c283058f, cn=Sharad Shankar Dabhadkar
Date: 2017.01.03 15:06:16 +05'30'

**(श.शं.दाभाडकर)**
**शासनाचे अवर सचिव**

**प्रत-** १) मा. राज्यपाल, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२) मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
३) सर्व मा. मंत्री/ मा. राज्यमंत्री, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
४) महालेखापाल, महाराष्ट्र राज्य, (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर.
५) कार्यकारी संचालक, तापी पाटबंधारे विकास महामंडळ, जळगांव.